"आश्रमशाळा समूह योजना-क्षेत्र
विकासाचा दृष्टीकोन".
एकत्रिकरण व सुलभीकरण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : शाआशा-१०९९/(प्र.क्र.९/९९)/का.१३
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, १९९९.

**शासन निर्णय** : राज्यातील डोंगराळ व दुर्गम भागातील सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागासलेल्या जनतेच्या सर्वागिण प्रगतीसाठी क्षेत्र विकासाचा दृष्टीकोन स्वीकारण्यात आला. या कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्राचा विकास होण्यासाठी मूळ केंद्रस्थान म्हणून तेथे आश्रमशाळा असावी असे ठरविण्यात आले त्या अनुषंगाने आश्रमशाळा सुरु करणे, तेथे अनुसूचित जमातीच्या मुलांना प्रवेश देणे व विविध सुविधा पुरविणे यासंबंधी सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या शासन निर्णयांचे एकत्रिकरण व सुलभीकरण करणे ही बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत आता खालील प्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :-

**आश्रमशाळा समूह योजना-उद्देश** :- महाराष्ट्र राज्यात डोंगराळ व दुर्गम भागात राहणाऱ्या जनतेची सामाजिक व शैक्षणिक प्रगती होण्यासाठी सन १९७२-७३ पासून क्षेत्र विकासाचा दृष्टीकोन स्वीकारण्यात आला. अशा भागाचा मूलभूत विकास व्हावा आणि त्याचा फायदा सर्वांना व्हावा यासाठी तेथे मूळ केंद्रस्थान म्हणून आश्रमशाळा असावी हा या योजनेचा मुख्य उद्देश आहे.

**योजनेवरील नियंत्रण व अंमलबजावणी** :- वरील योजनेवर शासनाचे पूर्णपणे नियंत्रण राहील. या योजनेची अंमलबजावणी आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या क्षेत्रीय पातळीवरील आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्यामार्फत करण्यात येते.

**आश्रमशाळा मंजूर करण्याचे निकष** :-डोंगराळ भागात ५००० ते ७००० आदिवासी लोकवस्तीसाठी एक आश्रमशाळा आणि दुर्गम भागात २००० ते ३००० आदिवासी लोकवस्तीसाठी एक आश्रमशाळा मंजूर करण्यात यावी. पाणी, वीज, रस्ता, रुग्णालय, पिठाची गिरणी इ. मूलभूत सोयी असलेल्या व साधारणपणे मध्यवर्ती ठिकाणी नवीन आश्रमशाळा मंजूर करण्यात यावी. या निकषानुसार सध्या राज्यात ४१० शासकीय आश्रमशाळा व २ आदर्श आश्रमशाळा कार्यरत आहेत. तसेच स्वयंसेवी संस्थामार्फत ३२५ अनुदानित आश्रमशाळा चालविण्यात येत आहेत.

**आश्रमशाळा योजनेची व्याप्ती, विकास इ.** :- आश्रमशाळा समूह योजना, राज्यातील अनुसूचित क्षेत्र, अतिरिक्त अनुसूचित क्षेत्र, माडा व मिनीमाडा आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर यामध्ये राबविण्यात येते. आश्रमशाळा सुरु करण्यास मंजूरी देण्यात आलेल्या वर्षी इयत्ता १ ली व इयत्ता २ री चा वर्ग सुरु करण्यात येतो. तद्नंतर पुढील वर्गवाढ (नैसर्गिक वाढीनुसार) करण्यात येते. अशारितीने प्राथमिक आश्रमशाळा इयत्ता ७ वी पर्यंन्त पूर्णत्वास पोहोचते. आश्रमशाळेमध्ये माध्यमिक स्तरावरील शिक्षण उपलब्ध करुन देण्यासाठी इयत्ता ७ वी पर्यंन्त पोहोचलेल्या आश्रमशाळांची पोस्ट बेसिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ करुन तेथे इयत्ता ८ वी चा वर्ग सुरु करण्यात येतो. यामध्येसुध्दा दरवर्षी पुढील वर्गवाढ करण्यात येते. अशारितीने माध्यमिक शाळा इयत्ता १० वी पर्यंत पूर्णत्वास पोहोचते. या योजनेंतर्गत प्रत्यक्ष गरज लक्षात घेऊन २ ते ३ आश्रमशाळामागे एका आश्रमशाळेची पोस्ट बेसिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ केली जाते. या निकषानुसार राज्यात २७३ शासकीय आश्रमशाळांची पोस्ट बेसिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ करण्यात आली आहे.

**आश्रमशाळेतील प्रवेश** :- शासकीय आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळेमध्ये प्रत्येक वर्गात ४० निवासी व १० बहिस्थ (डेस्कॉलर) अशा एकूण ५० विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा. ४० निवासी म्हणून प्रवेश दिलेले विद्यार्थी हे फक्त अनुसूचित जमातीचेच असावेत. आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळा ज्या ठिकाणी (गावात) असेल तेथील ५ विद्यार्थ्यांनाच बहिस्थ (डेस्कॉलर) म्हणून प्रवेश देण्यात यावा. असा बहिस्थ म्हणून प्रवेश देताना प्रथम अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. तसेच आश्रमशाळा/पोस्ट बेसिक आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांच्या ५ मुलांना प्रत्येक वर्गात बहिस्थ विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात यावा. या ५ जागांपैकी काही जागा रिक्त राहिल्या तर त्या जागेवर स्थानिक विद्यार्थ्यांना बहिस्थ विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात यावा. प्रवेश देता येणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये ५० टक्के मुले व ५० टक्के मुली असाव्यात. ज्या ठिकाणी (गावात) आश्रमशाळा / पोस्ट बेसिक आश्रमशाळा असेल तेथे १ कि.मी. परिसरामधील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना बहिस्थ (डेस्कॉलर) म्हणून प्रवेश देण्यात यावा. आश्रमशाळा / पोस्ट बेसिक आश्रमशाळेमधील प्रवेश क्षमता पूर्णपणे वापरण्यासाठी मुख्याध्यापक, प्रकल्प अधिकारी व सहाय्यक प्रकल्प अधिकारी यांनी याबाबत दक्षता घ्यावी. इयत्ता २ री ते इयत्ता १० वी पर्यंतच्या कोणत्याही इयत्तेत प्रवेश देण्यात येणाऱ्या विद्यार्थ्यांने त्या अगोदरची इयत्ता मान्यताप्राप्त प्राथमिक / माध्यमिक शाळेतून उत्तीर्ण केलेली असली पाहिजे.

**अनुत्तीणे विद्यार्थ्यांना प्रवेश** :-

(अ) शासकीय आश्रमशाळेत इयत्ता १ ली ते ९ वी या वर्गातील अनुत्तीर्ण मुलांना आश्रमशाळेत / पोस्ट बेसिक आश्रमशाळेत (वसतिगृहात) जागा असेल तरच पुन्हा एकदा निवासी विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात यावा. वसतिगृहात जागा नसेल तर मंजूर संख्येत बहिस्थ (डेस्कॉलर) म्हणून प्रवेश देण्यात यावा.

(ब) शासकीय (प्राथमिक) आश्रमशाळैतील अनुत्तीर्ण मुलींना आश्रमशाळेत निवासी विद्यार्थिनी म्हणून पुन्हा एका प्रवेशाची सवलत चालू ठेवावी.

(क) शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळेतील इयत्ता ८ वी व ९ वीतील अनुत्तीर्ण मुलींना आश्रमशाळेच्या वसतिगृहात जागा असेल तरच पुन्हा एकदा निवासी विद्यार्थिनी म्हणून प्रवेश देण्यात यावा. वसतिगृहात जागा नसेल तर मंजूर संख्येत बहिस्थ (डेस्कॉलर) म्हणून प्रवेश देण्यात यावा.

(ड) शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळेत माध्यमिक शालांत परीक्षेत अनुत्तीर्ण झालेल्या मुलामुलींना पोस्ट बेसिक आश्रमशाळेत निवासी विद्यार्थी / विद्यार्थिनी म्हणून पुन्हा एकदा प्रवेश देण्याची सवलत चालू ठेवण्यात यावी.

(ई) शासकीय आश्रमशाळा / पोस्ट बेसिक आश्रमशाळेत इयत्ता १ ली ते ९ वी मध्ये अनुत्तीर्ण झालेल्या मुलांना आणि इयत्ता ८ वी व ९ वी मधील अनुत्तीर्ण मुलींना आश्रमशाळेत / पोस्ट बेसिक आश्रमशाळेत जागेअभावी निवासी विद्यार्थी म्हणून तसेच मंजुर संख्येमध्ये बहिस्थ(डेस्कॉलर) म्हणून प्रवेश देणे शक्य झाले नाही तर, त्यांनी स्वत: त्यांची सोय इतरत्र करावी ही बाब, संबंधित मुख्याध्यापक व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी संबंधित विद्यार्थी / विद्यार्थिनींना स्पष्ट करावी.

**शासकीय आश्रमशाळा / पोस्ट बेसिक आश्रमशाळेतील कर्मचारी आकृतिबंध :-**

**(अ) शासकीय (प्राथमिक) आश्रमशाळा** :- प्राथमिक शाळा संहिता नियमानुसार इयत्ता १ ते ७ वर्ग असलेल्या आश्रमशाळेमध्ये मुख्याध्यापक-१ पद, पदवीधर प्राथमिक शिक्षक-१ व प्राथमिक शिक्षक-६ पदे अनुज्ञेय राहतील. याव्यतिरिक्त आश्रमशाळा वसतिगृहासाठी अधीक्षक-१ पद, स्वयंपाकी-५ पदे, कामाठी-५ पदे व पहारेकरी-१ पद या प्रमाणे एकूण २० पदे अनुज्ञेय राहतील.

**(ब) शासकीय पोस्ट बेसिक (माध्यमिक) आश्रमशाळा** :- माध्यमिक शाळा संहिता नियमानुसार इयत्ता ८ ते १० वर्ग असलेल्या पोस्ट बेसिक आश्रमशाळेमध्ये मुख्याध्यापक-१ पद, सहाय्यक शिक्षक-४ पदे, कनिष्ठ लिपिक-१ पद, प्रयोगशाळा परिचर / सहाय्यक-१ पद, शिपाई-१ पद, स्वयंपाकी-२ पदे, कामाठी-२ पदे व सफाई कामगार-१ पद याप्रमाणे एकूण १३ पदे अनुज्ञेय राहतील.

**आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा :-**

(१) शासकीय आश्रमशाळा निवासी शाळा आहेत. या शाळांमध्ये निवासी म्हणून प्रवेश दिलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षणाव्यतिरिक्त सकाळी नाश्ता, दुपारी व रात्री जेवण, राहण्याची सोय, अंथरुण-पांघरुण, पाठयपुस्तके, वहया, अन्य शैक्षणिक साहित्य, गणवेशाचे २

संच, क्रिडा साहित्य व आरोग्य तपासणी या सुविधा शासनामार्फत पुरविण्यात येतात. मुलींसाठी वसतिगृहाची स्वतंत्र इमारत असते.

(२) बहिस्थ म्हणून प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांना शिक्षणाव्यतिरिक्त दुपारचे जेवण, पाठयपुस्तके, वहया, अन्य शैक्षणिक साहित्य व गणवेशाचे २ संच या सुविधा शासनामार्फत मोफत पुरविण्यात येतात.

(३) आदिवासी भागात काम करणारे कर्मचारी तसेच आश्रमशाळेतील कर्मचारी यापैकी ज्या आदिवासी कर्मचाऱ्यांच्या मुलांना आश्रमशाळेत बहिस्थ म्हणून प्रवेश दिलेला असेल त्यांना ते आदिवासी असले तरी शिक्षणाव्यतिरिक्त कोणतीही सवलत अनुज्ञेय राहणार नाही.

**अन्य सुविधा /सवलती :-**

(१) शासकीय आश्रमशाळा डोंगराळ व दुर्गम भागात असून त्या निवासी असल्यामुळे तेथील विद्यार्थ्यांची आरोग्य तपासणी दर ३ महिन्यांनी करण्यात यावी.

(२) शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांच्या कला गुणांना वाव मिळण्यासाठी चित्रकला, रंगकला इ. स्पर्धा आयोजित करण्यात येतात. त्यामध्ये यशस्वी विद्यार्थ्यांना पारितोषिके देण्यात येतात.

(३) निवासी म्हणून प्रवेश दिलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचा मृत्यू नैसर्गिक आपत्ती, अपघात किंवा एकाकी आजारपण, सर्पदंश, पाण्यात पडून बुडून मरणे अशा प्रकारच्या कारणामुळे आश्रमशाळेत असताना झाल्यास, त्याच्या पालकास रुपये १५,०००/- एवढे सानुग्रह अनुदान देण्यात येते.

(४) शासकीय आश्रमशाळेच्या निवासी इमारती बांधण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई यांच्याकडून पक्क्या इमारतीचा आराखडा तयार करुन घेण्यात आलेला आहे. त्यानुसार आश्रमशाळेच्या पक्क्या इमारती बांधण्यात येतात. तसेच तातडीची उपाययोजना म्हणून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्याकडून निमपक्क्या स्वरुपाच्या वर्गखोल्या (शेडस्) अल्पकालावधीत बांधून घेण्यात येतात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. रा. बचेरे )
शासनाचे उप सचिव

**परिशिष्ट**

| | |
|---|---|
| १ | शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्र.बीसीपी-१०७२/३८९३-जी, दिनांक १४ ऑगस्ट, १९७२ व समक्रमांकाचे दिनांक २९ सप्टेंबर, १९७२ चे शुध्दीपत्र. |
| २ | शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, एएससी-१०८०/५००२०/का.१५, दिनांक १९ ऑक्टोबर, १९८२. |
| ३ | शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, एएससी-१०८१/का.१५, दिनांक १९ ऑक्टोबर, १९८१. |
| ४ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८३/३१८०४/का.१५, दिनांक १० मे, १९८४ |
| ५ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८५/५४३५/का.१३, दिनांक ९ सप्टेंबर, १९८५. |
| ६ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०८९/३६१२९/का.१३, दिनांक १३ डिसेंबर, १९८९. |
| ७ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९२/प्र.क्र.३०११/का.१३, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९२. |
| ८ | शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९२/प्र.क्र.३०११/का.१३, दिनांक २० फेब्रुवारी, १९९३. |
| ९ | शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, एएससी-१०८१/५६९५६/का.१५, दिनांक २४ फेब्रुवारी, १९८२. |
| १० | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९१/२८२७१/ (१९४५)/का.१३, दिनांक २३ मार्च, १९९२. |
| ११ | शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९१/२८२७१/ (१९४५)/का.१३, दिनांक ३१ मे, १९९३. |